**जर्मनीमधील स्टुटगार्ट येथे दि. १० जून ते १५ जून, २०२४ (प्रवासाच्या कालावधीसह) महाराष्ट्र शासनाचे माननीय मंत्री (शालेय शिक्षण) यांच्या नेतृत्वाखालील शिष्टमंडळाची भेट.**

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः विदौरा-२०२४/प्र.क्र.३९ /एस डी ६**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०००३२.

दिनांक : १० जून, २०२४

**वाचा:-**

सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र:- परदौ- १४२०/प्र.क्र.२६/११, दि.०१/०२/२०२१.

**प्रस्तावना :-**

बाडेन वुटेनबर्ग State Minister Dr. Florian Stegmann यांनी दि. २१.५.२०२४ रोजीचे पत्रान्वये दि. ११ जून ते १४ जून, २०२४ या कालावधीमध्ये जर्मनीतील बाडेन वुटेनबर्ग या राज्यामध्ये महाराष्ट्र शासन आणि जर्मनीमधील बाडेन वुटेनबर्ग या राज्यामधील सामंजस्य कराराच्या अनुषंगाने कृतीदलाची बैठक व विविध आंतरराष्ट्रीय संस्थांना भेटी यासाठी मा. मंत्री (शालेय शिक्षण) यांना आमंत्रित करण्यात आले आहे. सदर बैठकीसाठी या सामंजस्य कराराच्या अनुषंगाने नियुक्त करण्यात आलेल्या कृतीगटाच्या इतर सदस्यांनाही आमंत्रित करण्यात आलेले आहे. त्यानूसार मा. मंत्री (शालेय शिक्षण) यांनी आमंत्रण स्विकारले असून, या कार्यक्रमामध्ये राज्याचे प्रतिनिधीत्व करण्याकरिता मा. मंत्री (शालेय शिक्षण) शिष्टमंडळासह येथे भेट देणार आहेत.

२. युरोपियन युनियन मधील विविध देशांना कुशल मनुष्यबळाची कमतरता जाणवत आहे. महाराष्ट्रात औद्योगिक प्रशिक्षण संस्था (ITI) मार्फत विद्यार्थ्यांना कौशल्य विकासाचे प्रशिक्षण देण्यात येते. याशिवाय शालेय शिक्षण विभागामार्फत इ.९ वी ते इ.१२ वीच्या विद्यार्थ्यांना कौशल्यविषयक विषय शिकवण्यात येत आहेत. राज्यात मोठ्या प्रमाणात कुशल मनुष्यबळ उपलब्ध आहे. पण पुरेशा प्रमाणात नोकऱ्या उपलब्ध नाहीत. अशा वेळी या कुशल मनुष्यबळास युरोपियन युनियन देशांमध्ये नोकरीची संधी उपलब्ध होवू शकते. तथापि, यासाठी या विद्यार्थ्यांना काही प्रगत कौशल्य, जर्मन भाषा, परदेशात पाळावयाचा शिष्टाचार ई. साठी अतिरिक्त प्रशिक्षण देणे आवश्यक आहे. यासाठी, दि. २५.०२.२०२४ रोजी जर्मन राष्ट्रातील “बाडेन वुटेन बर्ग” या राज्यासोबत सामंजस्य करार करण्यात आलेला आहे. या सामंजस्य कराराच्या अनुषंगाने कृतीदलाची बैठक दि. १२.६.२०२४ रोजी स्टुटगार्ड जर्मनी येथे आयोजित करण्यात आलेली आहे. तसेच या दौऱ्यामध्ये विविध कंपन्या, हॅास्पीटल, शाळा आणि विविध आस्थापनांना भेट देण्याचे निश्चित करण्यात आलेले आहे. या दौऱ्यामध्ये आपल्या विद्यार्थांना जर्मनीमध्ये पाठविल्यानंतर तेथे व्हिसा, राहण्याच्या तसेच इतर काय अडचणी येतील याबाबतही या दौऱ्यामध्ये चर्चा होणार आहे. या सामंजस्य करारामुळे आणि या प्रस्तावीत दौऱ्यामुळे आपल्या राज्यामधील कुशल मनुष्यबळास युरोपियन युनियन देशांमध्ये नोकरीची संधी उपलब्ध होणार आहे.

३. या पार्श्वभूमीवर मा. मंत्री (शालेय शिक्षण) यांच्या नेतृत्वाखाली महाराष्ट्र शासनाच्या ७ सदस्यीय राज्यस्तरीय शिष्टमंडळास दि. १०.६.२०२४ ते १५.६.२०२४ या कालावधीत (प्रवासाच्या कालावधीसह) जर्मनी येथील स्टुटगार्ट व इतर ठिकाणी विदेश दौरा करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

श्री. दीपक केसरकर, मा. मंत्री (शालेय शिक्षण) यांच्या नेतृत्वाखालील राज्यस्तरीय शिष्टमंडळास महाराष्ट्र शासन आणि जर्मनीमधील बाडेन वुटेनबर्ग या राज्यामधील सामंजस्य कराराच्या अनुषंगाने कृतीदलाची बैठक व विविध आंतरराष्ट्रीय संस्थांना भेटी यामध्ये सहभागी होण्यासाठी खालील तक्त्यामध्ये नमूद केलेल्या कालावधीसाठी शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | नाव | पदनाम | दौऱ्याचा कालावधी |
|---|---|---|---|
| १ | श्री. दीपक केसरकर | मा. मंत्री (शालेय शिक्षण), महाराष्ट्र शासन | दि. १० जून ते १५ जून, २०२४ (प्रवासाच्या कालावधीसह) |
| २ | श्रीमती इड्जेस कुंदन | प्रधान सचिव (शालेय शिक्षण), मंत्रालय, मुंबई | दि. १० जून ते १५ जून, २०२४ (प्रवासाच्या कालावधीसह) |
| ३ | श्री. सुरज मांढरे | आयुक्त (शिक्षण), पुणे | दि. १० जून ते १५ जून, २०२४ (प्रवासाच्या कालावधीसह) |
| ४ | श्री. प्रदीपकुमार डांगे | राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई | दि. १० जून ते १५ जून, २०२४ (प्रवासाच्या कालावधीसह) |
| ५. | श्री. राहूल रेखावार | संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद पुणे. | दि. १० जून ते १५ जून, २०२४ (प्रवासाच्या कालावधीसह) |
| ६ | श्री. मंगेश शिंदे | मा. मंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई (सह सचिव) | दि. १० जून ते १५ जून, २०२४ (प्रवासाच्या कालावधीसह) |
| ७ | श्री. तुषार महाजन | उपसचिव शालेय शिक्षण व क्रीडा विभाग | दि. १० जून ते १५ जून, २०२४ (प्रवासाच्या कालावधीसह) |

**२.** परराष्ट्र मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचेमार्फत मा. मंत्री (शालेय शिक्षण) यांचे नेतृत्वाखाली शिष्टमंडळाचे भेटीस संदर्भ अर्ज क्रमांक EPC EPC०४०६२४९८९०1DE आणि EPC०४०६२४९८९०३DE दि. ०७.०६.२०२४ अन्वये मंजूरी प्राप्त आहे.

**३.** सदर बैठक व विविध आंतरराष्ट्रीय संस्थांना भेटी या कालावधीत मा. मंत्री (शालेय शिक्षण) यांच्यासह शिष्टमंडळातील सर्व सदस्यांचा जर्मनी दौ-याचा संपूर्ण खर्च शालेय शिक्षण विभागांतर्गत महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषदे मार्फत स्टार्स (STARS) प्रकल्पांतर्गत SIG ३.२ अंतर्गत तरतूदीतून करण्यात येणार आहे.

४. शिष्टमंडळातील सदस्यांना भारत सरकारच्या विहित नियमांनुसार प्रवास खर्च व दैनिक भत्ता अदा करण्यात यावा.

५. श्रीमती इड्जेस कुंदन, प्रधान सचिव (शालेय शिक्षण) दि. १० जून ते दि. १५ जून , २०२४ (प्रवासाच्या कालावधीसह), श्री. सुरज मांढरे, आयुक्त (शिक्षण), पुणे दि. १० जून ते दि. १५ जून , २०२४), श्री. प्रदीपकुमार डांगे, राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई दि. १० जून ते दि. १५ जून , २०२४ (प्रवासाच्या कालावधीसह), श्री. राहूल रेखावार संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद पुणे दि. १० जून ते दि. १५ जून, २०२४ (प्रवासाच्या कालावधीसह), श्री. मंगेश शिंदे मा. मंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई (सहसचिव) दि. १० जून ते दि. १५ जून , २०२४ (प्रवासाच्या कालावधीसह), आणि श्री. तुषार महाजन उपसचिव शालेय शिक्षण व क्रीडा विभाग दि. १० जून ते दि. १५ जून , २०२४ (प्रवासाच्या कालावधीसह) हे शिष्टमंडळाचा एक भाग म्हणून सहभागी होऊन जर्मनी येथील स्टुटगार्ट व इतर ठिकाणी अधिकृत भेट देत असल्याने, त्यांचा सदरील दौ-याचा संपूर्ण कालावधी प्रवासाच्या कालावधीसह कर्तव्य कालावधी म्हणून समजण्यात यावा.

६. सदर विदेश दौरा पूर्ण झाल्यानंतर संबंधित अधिकाऱ्यांनी त्यांच्या विदेश दौऱ्यासंबंधीचा विस्तृत अहवाल प्रशासकीय विभागास तसेच सामान्य प्रशासन विभागास सादर करावा. तसेच विदेश दौऱ्यात प्राप्त केलेल्या ज्ञानाचा/कौशल्याचा उपयोग अन्य अधिकारी/ कर्मचारी यांना प्रशिक्षण देण्यासाठी करावा.

७. सदर शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाने ई-नस्ती क्र. ७८१०८९/२०२४ अन्वये दिलेल्या शिफारस समितीच्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०६१०१७४३०३१६२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT,
2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e8918118634069a6cc7a22b9f,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2024.06.10 17:56:33 +05'30'

**( तुषार महाजन )**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. सचिव, शालेय शिक्षा मंत्रालय, शालेय शिक्षा व साक्षरता विभाग, भारत सरकार, नवी दिल्ली.
२. सचिव, अर्थ मंत्रालय,आर्थिक कार्य विभाग,भारत सरकार नवी दिल्ली.
३. सचिव, परराष्ट्र मंत्रालय,भारत सरकार, नवी दिल्ली.
४. सचिव, गृह मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली.

५. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-३२.
६. प्रधान सचिव (मुख्यमंत्री सचिवालय), मंत्रालय,मुंबई-३२.
७. श्रीमती इड्जेस कुंदन, प्रधान सचिव (शालेय शिक्षण), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२
८. श्री. सुरज मांढरे, आयुक्त (शिक्षण), शिक्षण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
९. श्री. प्रदीपकुमार डांगे, राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, चर्नी रोड, मुंबई
१०. श्री. राहूल रेखावार संचालक एस.सी. आर टी. ई पुणे
११. श्री. मंगेश शिंदे मा. मंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई (सहसचिव)
१२. श्री. तुषार महाजन उपसचिव शालेय शिक्षण व क्रीडा विभाग मंत्रालय मुंबई ३२
१३. संयुक्त नियंत्रक एक्सचेंज कंट्रोल डिपार्टमेंट, रिझर्व बैंक ऑफ इंडिया, मुंबई.
१४. प्रधान महालेखापाल -१/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र (मुंबई/नागपूर)
१५. प्रधान महालेखापाल -१/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र (मुंबई/नागपूर)
१६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१७. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे